**नायब तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना देणेबाबत....**
**(नियतकालीक) (छत्रपती संभाजीनगर विभाग)**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्र.बदली-२०२४/प्र.क्र.१६२/ई-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - ०६ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) मा. भारत निवडणूक आयोगाचे पत्र दि.२०.०६.२०२४ व दि.३१.०७.२०२४
३) समक्रमांकाचे शासन आदेश दि.३१.०७.२०२४

**शासन आदेश : -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार, उक्त वाचा-३ येथील आदेशान्वये श्री. बी. व्ही. बेरुळे, नायब तहसीलदार (महसूल-२), तहसील कार्यालय लातुर, जि. लातुर यांची नायब तहसीलदार (महसुल-२), तहसिल कार्यालय शिरुर अनंतपाळ, जि. लातुर या रिक्त पदावर बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेली आहे. तथापि, नायब तहसीलदार (महसूल-२), तहसील कार्यालय लातुर, जि. लातुर हे पद "सहाय्यक मतदार नोंदणी अधिकारी" म्हणुन अधिसुचित केले असल्यामुळे व मा. भारत निवडणुक आयोगाच्या उक्त वाचा-२ येथे नमूद पत्रान्वये दिलेले निर्देश लक्षात घेता श्री. बेरुळे यांची उक्त वाचा-३ येथील आदेशान्वये करण्यात आलेली बदली रद्द करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने श्री. बेरुळे यांची उक्त वाचा-३ येथील आदेशान्वये करण्यात आलेली बदली पुढील आदेशापर्यंत रद्द करण्यात येत आहे. त्याच्या परिणामी श्री. बेरुळे यांच्याजागी दर्शविण्यात आलेले श्री. बेंबळगे यांचा स्वजिल्हा लातुर असल्याने त्यांची देखील बदली रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२४०८०६२०१५१७२११९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.08.06 20:30:01 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६) जिल्हाधिकारी, लातुर
७) प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई .
८) जिल्हा कोषागार अधिकारी, लातुर.
९) संबंधित आहरण व वितरण अधिकारी.
१०) सर्व संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर यांच्यामार्फत)
११) उप सचिव (ई-९) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२